कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांच्या बदल्या व नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन
# जलसंपदा विभाग
## शासन आदेश क्रमांकः एलटीएस-१११४/(२७७/२०१४)/आ (वर्ग-१)

गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४००००१.

**तारीख: ११ ऑगस्ट,२०१४**

**<u>वाचा:-</u> जलसंपदा विभाग शासन आदेश क्र.एलटीएस-१११४/(३२९/२०१४)/आ.(वर्ग-१), दि.११.०८.२०१४.**

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील अधिकाऱ्याची बदलीने नियुक्ती खाली दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | बदलीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.अ.ना.लाडोळे | कार्यकारी अभियंता, पूर्णा मध्यम प्रकल्प विभाग, अचलपूर. | कार्यकारी अभियंता, उर्ध्व वर्धा कालवे विभाग क्र.१, अमरावती | बदली अधिनियमातील कलम ४(४) नुसार श्री.जी.एन.उघडे यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी (विनंतीनुसार) |

२. श्री.अ.ना.लाडोळे यांच्या बदलीने रिक्त राहणाऱ्या पदावर अन्य अधिकाऱ्याच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे काढण्यात येत आहेत.

३. संबंधीत वरिष्ठ अधिका-यांना कळविण्यात येते की, सदर नियुक्ती / पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास आपल्या नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे.

४. संबंधीत अधिकाऱ्यास नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरित कळवावे.

५. संबंधीत अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते

संबंधीत अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

६. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधीतांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१४०८१२१२१४५०४७२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Vitthalrao Veer

Digitally signed by Madhav Vitthalrao Veer
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madhav Vitthalrao Veer
Date: 2014.08.12 12:11:35 +05'30'

**(डॉ.माधव वीर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१) प्रधान सचिव (जलसंपदा प्रकल्प व विकास)/ प्रधान सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
३) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
४) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
५) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
६) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
७) खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंपदा (कृ.खो.पा.वि.म.वगळून), मंत्रालय, मुंबई.
८) खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंपदा (कृ.खो.पा.वि.म.),मंत्रालय, मुंबई.
९) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, (जलसंपदा),मंत्रालय, मुंबई.
१०) संबंधीत अधिकारी.
११) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१२) सह सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) कार्यासने - दक्षता-१/दक्षता-२/दक्षता-३/गोपनीय शाखा/जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१४) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.